समग्र शिक्षा (माध्यमिक विभाग) कार्यक्रमासाठी दुसऱ्या हप्त्याचा अनुसूचित जमाती (TSP) उप योजनेचा निधी वितरीत करणेबाबत (केंद्र व राज्य हिस्सा).

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०१९/प्र.क्र.१११ भाग-४/एस.डी-१**
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०५ जून, २०२०

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६/०४/२०२०
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४/०५/२०२०
३) केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली आदेश क्रमांक: F.No-७-५/२०१९-IS-१२(ST), दि.०४/०२/२०२०
४) समग्र शिक्षा अभियान यांचे पत्र क्र.रामाशिअ/लेखा/केंद्र व राज्य हिस्सा/(३६/१९)/ २०२०/१४७, दि.१८/०२/२०२०
५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०२०/प्र.क्र.०४/कार्यासन-६, दि.०१/०६/२०२०

**प्रस्तावना:-**

समग्र शिक्षा (माध्यमिक विभाग) योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र:राज्य) ६०:४० असे आहे. सन २०१९-२० या वर्षाकरिता केंद्र शासनाने समग्र शिक्षांतर्गत (माध्यमिक विभाग) उपक्रमांकरिता दि.०४/०२/२०२० रोजीच्या आदेशान्वये मंजूर केलेला दुसऱ्या हप्त्याचा आवर्ती अनुसूचित जमाती (TSP) हिस्स्याचा रुपये १,६६,१३,०००/- इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केल्याबाबत वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.७१/अर्थोपाय, दि.२०/०२/२०२० अन्वये अभिप्राय दिले आहेत. आदिवासी विकास विभागाने संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष (२२०२ आय ६४८), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) खाली केंद्र हिस्सा रु.१,६६,१३,०००/- व लेखाशिर्ष (२२०२ आय ६५७), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) खाली राज्य हिस्सा रु.१,१०,७५,०००/- इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता दिली आहे.

राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, मुंबई यांनी संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाने उपरोक्त प्रमाणे माध्यमिक शिक्षणाकरिता उपलब्ध करुन दिलेला निधी खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, मुंबई यांच्याकडे समग्र शिक्षा कार्यक्रमाच्या (माध्यमिक विभाग) अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर विवरणपत्रातील स्तंभ क्र.४ येथील वितरीत करावयाची तरतूद स्तंभ क्र.२ येथील लेखाशिर्षाकरिता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

| अ. क्र. | लेखाशिर्ष | सन २०२०-२१ या वर्षात अर्थसंकल्पिय तरतूद | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | "मागणी क्रमांक टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (१०) समग्र शिक्षा अभियान (अनुसूचित जमाती उपयोजना (TSP), (केंद्र हिस्सा ६० टक्के), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२।६४८)" | रु.१७५ कोटी | रुपये १,६६,१३,०००/- |
| २ | "मागणी क्रमांक टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (११) समग्र शिक्षा अभियान (अनुसूचित जमाती उपयोजना (TSP), (राज्य हिस्सा ४० टक्के), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२।६५७)" | रु.१०० कोटी | रुपये १,१०,७५,०००/- |
| | | **एकूण** | **रु.२,७६,८८,०००/-** |

**२.** वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.१६/०४/२०२० व शासन निर्णय, दि.०४/०५/२०२० मधील नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाचे दि.०४/०२/२०२० रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केल्याप्रमाणे समग्र शिक्षा अंतर्गत माध्यमिक शिक्षणाच्या चालू योजनांच्या आवर्ती खर्चासाठी खर्च करावा.

४. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५. अनुसूचित जमाती या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय /उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ.माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

६. आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तीक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

८. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६/०४/२०२० चे परिपत्रक व शासन निर्णय दि.०४/०५/२०२० मधील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करुन निधी समग्र शिक्षा (माध्यमिक विभाग) यांच्या बँक खात्यात जमा करावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६/०४/२०२० चे परिपत्रक व शासन निर्णय दि.०४/०५/२०२० अन्वये, आदिवासी विकास विभागाच्या दि.०१/०६/२०२० च्या शासन निर्णयान्वये, वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.७१/अर्थोपाय, दि.२०/०२/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६०५१६४६०६११२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gaikwad
Santosh
Umeshrao

Digitally signed by Gaikwad Santosh Umeshrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education & Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, serialNumber=bc8833f9e213a7e4dfb9d2b071c9202ea52a04054e53b0c1bbf9e50c90a2cf5c, cn=Gaikwad Santosh Umeshrao
Date: 2020.06.05 17:29:25 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
४) मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
६) मा.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा (माध्यमिक विभाग), चर्नीरोड, मुंबई
८) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१०) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
११) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१२) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१३) उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) वित्त विभाग(व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१५) अवर सचिव, लेखा शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती (एस.डी.१)